**खाजगी क्षेत्रातील जमीन सिंचन व इतर प्रकल्पांसाठी खाजगी वाटाघाटीव्दारे थेट खरेदी पध्दतीने घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमाक:-संकीर्ण-०३/२०१५/प्र.क्र.३४/अ-२**
मंत्रालय, मुंबई
दिनांक:- १२ मे, २०१५

<u>प्रस्तावना:-</u>

मा. मुख्यमंत्री महोदयांकडे विदर्भातील जिल्हयांच्या विकास आराखडयाबाबत झालेल्या चर्चेच्यावेळी पाटबंधारे तसेच इतर प्रकल्पांसाठी जमीन संपादन करतांना ब-याच अडचणी येतात, त्यामुळे प्रकल्पाचे काम सुरु होण्यास व पर्यायाने त्याचा लाभ लाभधारकांना मिळण्यास विलंब होतो, ही बाब प्रकर्षाने मा.मुख्यमंत्री महोदयांच्या निदर्शनास आणून देण्यात आली. केंद्र शासनाच्या नवीन भूसंपादन कायद्यान्वये मिळणारा मोबदला व त्यापूर्वी राज्य शासनामार्फत देण्यात येणारा मोबदला तसेच शेतक-यांकडून थेट वाटाघाटीद्वारे जमीन खरेदी करतांना मिळणारा मोबदला यांच्यामध्ये तफावत असल्याने शेतकरी जमीन देण्याबाबत संभ्रमात आहेत. त्यामुळे प्रकल्पासाठी जमीन मिळण्यास व पर्यायाने प्रकल्पाचे काम सुरु होण्यास विलंब होत आहे. हे लक्षात घेऊन मा. मुख्यमंत्री महोदयांच्या निदेशानुसार शासन निर्णय, नियोजन विभाग, दिनांक २४.१२.२०१४ रोजीच्या निर्णयान्वये विशेष समिती गठित करण्यात आलेली होती. सदर समिती अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आली होती. तथापि सदर समितीच्या संरचनेत अंशत: बदल शासन निर्णय, दिनांक १२.२.२०१५ अन्वये करण्यात येऊन सदर समितीचे अध्यक्ष अप्पर मुख्य सचिव (वित्त) हे राहतील व या विशेष समितीने आपला परिपूर्ण प्रस्ताव एक महिन्याच्या आत सादर करावा असे शासन निर्णयात नमूद केलेले आहे. सदर समितीच्या दिनांक २४.३.२०१५ रोजी आयोजित बैठकीत सांगोपांग विचार करून खाजगी क्षेत्रातील जमीन सिंचन व इतर प्रकल्पांसाठी वाटाघाटीव्दारे थेट खरेदी पध्दतीने घेण्याबाबत नवीन भूसंपादन कायद्यानुसार प्रकल्पांसाठी खाजगी जमीन थेट खरेदीने घेण्यास कोणतेही बंधन नसल्यामुळे समितीने काही मार्गदर्शक तत्वे विचारात घेवून खाजगी जमीन विकत घेण्याची शिफारस शासनास केली आहे. समितीने त्यासंदर्भातील केलेल्या शिफारशी लक्षात घेवून शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सर्वसाधारणपणे विविध प्रकल्पांसाठी आवश्यक असणारी खाजगी जमीन संबंधित भूसंपादन संस्था अस्तित्वात असणा-या भूसंपादन कायद्यानुसार संपादन करते. तथापि जर अशा भूसंपादन संस्थेला आवश्यक असणारी जमीन भूसंपादन कायद्यानुसार संपादित न करता थेट खरेदी पध्दतीने विकत घेण्यास कायद्याने कोणतेही बंधन नसल्यामुळे खालील मार्गदर्शक तत्वे विचारात घेऊन विकत घेण्याची मुभा राहील.

<u>(अ) मार्गदर्शक तत्वे</u>

<u>नविन प्रकल्पासाठी :-</u>

१) सिंचन प्रकल्पांव्यतिरिक्त नवीन प्रकल्पासाठी थेट जमीन खरेदी करतांना ती पूर्ण प्रकल्पासाठी करण्यात यावी.

२) सिंचन प्रकल्पांच्या बाबतीत धरण बैठक (Dam Site), बुडीत क्षेत्र, पुनर्वसन क्षेत्र व मुख्य कालवे (५०%) व वितरिका (५०%) इतक्या जमिनी थेट खरेदीने घ्याव्यात.

<u>अपूर्ण प्रकल्पासाठी :-</u>

१) सिंचनाव्यतिरिक्त कोणताही अपूर्ण प्रकल्प पूर्ण करण्याकरिता आवश्यक असलेली सर्व शिल्लक जमीन भूसंपादनाऐवजी थेट खरेदीने करता येईल. मात्र अशी जमीन खरेदी टप्याटप्याने न करता पूर्णत: करण्यात यावी.

२) **अ)** अपूर्ण सिंचन प्रकल्पांच्या बाबतीत धरण बैठक, बुडीत क्षेत्र, पुनर्वसन क्षेत्र, मुख्य कालवे (५०%) व वितरिका यासाठी लागणारी उर्वरित जमीन (भूसंपादन प्रक्रिया सुरु न झालेले) थेट खरेदीने पूर्णत: घ्यावी.

**ब)** पाणी साठा झाला असल्यास व केवळ कालव्यासाठी जमिनीची आवश्यकता असेल तर पाणी पोहोचलेल्या ठिकाणापासून पाणी पुढे नेण्यासाठी आवश्यक जमिनी सलगरित्या थेट खरेदीने घ्याव्यात.

## (ब) मोबदला निश्चितीसाठीची जिल्हास्तरीय समिती

१) थेट खरेदी करावयाच्या जमिनीच्या मोबदल्याबाबतचा दर ठरविण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करावी. सदर समितीची संरचना खालीलप्रमाणे राहील.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| २) | अधिक्षक अभियंता (जलसंपदा) | - | सदस्य |
| ३) | अधिक्षक अभियंता (सार्वजनिक बांधकाम) | - | सदस्य |
| ४) | जिल्हा सरकारी वकील | - | सदस्य |
| ५) | सहायक संचालक, नगर रचना | - | सदस्य |
| ६) | संपादक संस्थेचा सक्षम अधिकारी | - | सदस्य |
| ७) | संबंधित उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) | - | सदस्य सचिव |

समितीमध्ये आवश्यकतेप्रमाणे झाडांचे / फळझाडांचे / वन झाडांचे / उभ्या पिकांचे (Standing Crops), बांधकामाचे व इतर बाबींचे मूल्यांकन करण्यासाठी कृषि, वन, उद्यानविद्या या विषयातील सक्षम अधिकाऱ्यांचा अथवा त्या विषयाशी संबंधित तज्ञ यांचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करावा.

२) वरील समिती जमिनीचा मोबदला निश्चित करण्यापूर्वी प्रचलित भूसंपादन कायद्यानुसार जमिनीचे मूल्यांकन व जमिनीच्या मूळ मालकाचा मूळ दस्ताऐवज व जमिनीचा लिगल सर्च रिपोर्ट (Legal Search Report) सरकारी वकीलांमार्फत तपासून घेईल.

## (क) मोबदला निश्चितीची कार्यपध्दती

प्रकल्पासाठी जमीन थेट खरेदीने घेताना भूसंपादन कायदा २०१३ मधील कलम २६ ते ३० च्या व शेड्युल-१ च्या तरतुदीनुसार संबंधित जमिनीसाठी देय होणाऱ्या मोबदल्याची परिगणना सदर जमिनीशी निगडीत सर्व बाबी विचारात घेऊन प्रथम करण्यात यावी. त्यानंतर सदर परिगणित होणाऱ्या एकूण मोबदल्याच्या रक्कमेवर २५% रक्कम वाढीव देण्यात यावी.

## (ड) मोबदला स्विकारतांना शेतक-यांसाठीचा विकल्प

प्रकल्पांसाठी शेतकऱ्यांची जमीन थेट खरेदीने घेतांना त्यांना देय होणाऱ्या मोबदल्यासाठी त्यांना पुढीलप्रमाणे दोन विकल्प देण्यात यावेत.

१) वरील **“ क ”** प्रमाणे परिगणित होणारा संपूर्ण मोबदला एकरकमी देणे.

अथवा

२) **अ)** जमीन खरेदी करतांना / ताब्यात घेतांना संपूर्ण मोबदल्यापैकी पहिला टप्यामध्ये ५०% रक्कम एकरकमी देणे,

**ब)** उर्वरीत ५०% रक्कम वर्षासन (Annuity) स्वरूपात देणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०५१२१४५०४४२९१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SUBHASH KISANRAO GAWADE

Digitally signed by SUBHASH KISANRAO GAWADE
DN: CN = SUBHASH KISANRAO GAWADE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.05.12 15:51:39 +05'30'

**( सु.कि.गावडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (वित्त व वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०)प्रधान सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११)प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२)प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३)सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४)सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५)सर्व विभागीय आयुक्त
१६)सर्व जिल्हाधिकारी
१७)संचालक, नगर रचना, पुणे
१८) सर्व अधिक्षक अभियंता, (सार्वजनिक बांधकाम / जलसंपदा )
१९)सर्व जिल्हा सरकारी वकील
२०)निवडनस्ती (अ-२)